**श्रीमती एम.एन.केरकेट्टा, भा.प्र.से., यांच्या व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या, मुंबई या पदावरील प्रतिनियुक्तीच्या अटी / शर्ती विहित करण्याबाबत-**

# महाराष्ट्र शासन
## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
## शासन निर्णय क्रमांकः सपस-२०१५/प्र.क्र.१०१/२४ स,

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: १३ मे, २०१५

वाचा :-

१) सामान्य प्रशासन विभाग अ.शा.पत्र क्र.एईओ-१११५/१०/२०१५/दहा, दिनांक २५.३.२०१५
२) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई यांचे पत्र क्र. एमडी/डीओ/एसईसी/ २०१५-१६, दिनांक ६.४.२०१४

**शासन निर्णय :-**

श्रीमती एम.एन.केरकेट्टा, भा.प्र.से., यांची संदर्भ क्रमांक (१) येथील शासनपत्रान्वये व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई या पदावर प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात आली आहे. त्या अनुषंगाने, श्रीमती एम.एन.केरकेट्टा यांच्या व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई या पदावरील प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती पुढीलप्रमाणे विहीत करण्यात येत आहेत :-

**(१) प्रतिनियुक्तीचा कालावधी :-** श्रीमती एम.एन.केरकेट्टा, भा.प्र.से. हया दिनांक ३०.३.२०१५ (म.पू.) ते पुढील आदेश होईपर्यंत वरील स्वीयेतर सेवेत प्रतिनियुक्तीवर असतील मात्र -

अ) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनास आवश्यक वाटली तर त्यांना त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी पूर्ण होण्यापूर्वी स्वीयेतर सेवेतून केव्हाही परत बोलावण्याचा हक्क शासनास असेल,

आ) त्यांच्या सेवेची आवश्यकता महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई या संस्थेस नसेल तर ते त्यांना शासन सेवेत परत पाठवू शकतात. मात्र, ज्या दिनांकापासून तसे करावयाचे असेल त्याच्या कमीत कमी ३ महिने अगोदर तसे कळविणे आवश्यक राहील.

(२) **वेतन** :- श्रीमती एम.एन.केरकेट्टा, भा.प्र.से. हया सदर प्रतिनियुक्तीच्या कालावधीत व्यवस्थापकीय संचालक हे पद धारण करतील. सदर कालावधीत त्या भारतीय प्रशासन सेवेतील वेतनश्रेणी रुपये PB-४ रु. ३७४०० - ६७००० + श्रेणीवेतन रु. १०,०००/- मध्ये वेतन घेतील. त्यांच्या वार्षिक वेतनवाढी मंजूर करण्याबाबतचे आदेश शासनाच्या सामान्य प्रशासन विभागाकडून निर्गमित करण्यात येतील. श्रीमती एम.एन.केरकेट्टा यांचे वार्षिक वेतनवाढी पूर्वीचे म्हणजेच दिनांक १.७.२०१४ ते दिनांक ३०.६.२०१५ या कालावधीत मूळ वेतन रुपये ५५३२०/- + श्रेणीवेतन रु. १०,०००/- इतके व वार्षिक वेतनवाढ दिनांक १.७.२०१५ रोजी अनुज्ञेय केल्यानंतर मूळ वेतन रुपये ५७२८०/- + श्रेणीवेतन रु. १०,०००/- इतके राहील.

(३) **प्रतिनियुक्ती भत्ता** :- श्रीमती एम.एन.केरकेट्टा, भा.प्र.से. यांना प्रतिनियुक्तीच्या सदर कालावधीत शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. भाप्रसे-३०१३/(३१२)/ नऊ, दिनांक ११.९.२०१३ अन्वये निर्गमित केलेल्या आदेशातील अटीनुसार प्रतिनियुक्ती भत्ता महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई ही संस्था देईल. तसेच, सदर कालावधीत त्यांना जरी त्यांच्या अंतिम वेतन प्रमाणपत्रातही तसे नमूद केले असले तरी विशेष वेतन अनुज्ञेय असणार नाही.

(४) **महागाई भत्ता** :- श्रीमती एम.एन.केरकेट्टा, भा.प्र.से. यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांना वेळोवळी ज्या दराने महागाई भत्ता अनुज्ञेय असेल त्या दराने महागाई भत्ता अनुज्ञेय असेल.

(५) **स्थानिक पूरक भत्ता** :- श्रीमती एम.एन.केरकेट्टा, भा.प्र.से. यांना राज्य शासनाच्या नियमांनुसार / आदेशानुसार वेळोवेळी अनुज्ञेय असेल त्या दराने स्थानिक पूरक भत्ता अनुज्ञेय असेल.

(६) **निवास्थान किंवा त्याऐवजी घरभाडे भत्ता** :- श्रीमती एम.एन.केरकेट्टा, भा.प्र.से. यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्यांच्या दर्जास साजेसे निवासस्थान महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई ही संस्था देईल. तथापि, ती संस्था त्यांना योग्य असे निवासस्थान देवू शकत नसेल आणि त्यांच्या ताब्यात प्रतिनियुक्तीवर जाण्यापूर्वी शासकीय निवासस्थान असेल तरच ते शासकीय निवासस्थान प्रतिनियुक्तीच्या कालावधीत आपल्या ताब्यात ठेवू शकतात. मात्र, प्रतिनियुक्तीवर गेलेल्या दिनांकानासून पहिले ३ महिने त्यांना विहित सामान्य दराने व त्यानंतर आर्थिक दराने शासकीय निवासस्थानाचे अनुज्ञेय शुल्क व सेवाशुल्क भरणे आवश्यक आहे. महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई या संस्थेच्या नियमांनुसार

त्यांना भाडेरहित तत्वावर निवासस्थान देय असेल तर त्याचा लाभ श्रीमती एम.एन.केरकेट्टा, भा.प्र.से. यांना घेता येईल.

प्रतिनियुक्तीच्या सदर कालावधीत त्यांच्या ताब्यात शासकीय किंवा संस्था यांचे निवासस्थान नसेल तर त्यांना सा.प्र.वि.शासन निर्णय क्रमांक भाप्रसे-१००८/प्र.क्र.२६२/०८/९, दिनांक २१.१०.२००९ नुसार तसेच त्यामध्ये वेळोवेळी केलेल्या बदलानुसार अनुज्ञेय असलेला घरभाडे भत्ता अनुज्ञेय असेल.

(७) **पदग्रहण अवधी वेतन आणि बदली प्रवास भत्ता** :- श्रीमती एम.एन.केरकेट्टा, भा.प्र.से. यांना त्यांची स्वीयेतर सेवेत बदली झाल्यानंतर आणि तेथून परत आल्यानंतर, अशा दोन्ही वेळेच्या पदग्रहण अवधीमध्ये, त्यांचे वेतन व प्रवास भत्ता, तो अधिकारी ज्या शासनाच्या सेवेत असतांना स्वीयेतर सेवेत गेला असेल ते शासन किंवा स्वीयेतर सेवेतून परत आल्यानंतर ज्या शासनाच्या सेवेत जाणार असेल ते शासन यांच्या संवंधित नियमानुसार महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई ही संस्था देईल.

(८) **प्रतिनियुक्तीच्या कालावधीत कर्तव्यार्थ केलेल्या प्रवासाकरिता प्रवासभत्ता** :- श्रीमती एम.एन.केरकेट्टा, भा.प्र.से यांना स्वीयेतर रुजू झाल्यानंतर कर्तव्यार्थ कराव्या लागणाऱ्या प्रवासाकरिता राज्य शासनाच्या संबंधित नियमान्वये किंवा या संस्थेच्या नियमान्वये यापैकी ज्यांचे नियम अधिक फायदेशीर असतील त्या नियमांनुसार प्रवासभत्ता आणि दैनिक भत्ता अनुज्ञेय असेल.

(९) **रजा** :- श्रीमती एम.एन.केरकेट्टा, भा.प्र.से. यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत अखिल भारतीय सेवा (रजा) नियम, १९५५ हे नियम लागू असतील. प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्यांना नैमित्तिक रजा व्यतिरिक्त इतर रजा मंजूर करण्यास शासन (सा.प्र.वि.) समक्ष असेल. स्वीयेतर सेवेच्या कालावधीत अथवा अखेरीस घेतलेल्या रजेच्या कालावधीबद्दल द्यावयाच्या रजा वेतनाचा व कोणत्याही स्थानिक पूरक भत्त्यावरील संपूर्ण खर्च महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई हया संस्थेस सोसावा लागेल.

(१०) **विकलांगता रजेबद्दल रजा वेतन** :- स्वीयेतर सेवेत किंवा अशा सेवेमुळे आलेल्या विकलांगतेबद्दल मंजूर करण्यात येणाऱ्या रजेच्या संबंधात, अशी विकलांगता स्वीयेतर सेवा संपल्यानुसार उघडकीस आली तरीसुध्दा रजा वेतन देण्यास महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई ही संस्था जबाबदार असेल. अशा रजा वेतनाचा खर्च त्या संस्थेकडून वसूल करण्यात येईल.

(११) **<u>रजा वेतन व निवृत्तीवेतन अंशदाने</u> :-** श्रीमती एम.एन.केरकेट्टा, भा.प्र.से. यांच्याबाबत रजा वेतन व निवृत्तीवेतन अंशदान हे साप्रवि शासन परिपत्रक क्र. भाप्रसे १४१३/प्र.क्र. २२०/२०१३/९-अ, दिनांक १२.२.२०१४ मध्ये नमूद मार्गदर्शक सूचनांनुसार, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई ही संस्था शासनाकडे (सा.प्र.वि./का.९ अ) प्रत्येक आर्थिक वर्षाच्या समाप्तीपासून १५ दिवसांच्या आत किंवा जर स्वीयेतर सेवा आर्थिक वर्ष संपण्यापूर्वी समाप्त झाली असेल तर स्वीयेतर सेवा समाप्तीनंतर भरणा करील. हया रकमा दोन वेगवेगळया डिमांड ड्राफटद्वारे (पहिला रजा वेतनाच्या रकमेचा व दुसरा निवृत्तीवेतन अंशदानाच्या रकमेचा) सहायक संचालक (लेखा), सामान्य प्रशासन विभाग/का.९ अ, मंत्रालय, मुंबई- ३२ यांच्या कडे पाठविणे आवश्यक आहे. सदर डिमांड ड्राफटस बृहन्मुंबईतील कोणत्याही अनुसूचित बँकेचे व सहायक संचालक (लेखा), सामान्य प्रशासन विभाग/का.-९ अ, मंत्रालय मुंबई- ४०० ०३२ या नांवे काढलेले असणे आवश्यक आहे. सदर रकमा पुढील लेखाशिर्षाखाली जमा दर्शविण्यात याव्यात.

अ) **<u>रजा वेतन</u> :-** "००७० इतर प्रशासकीय सेवा-६० इतर सेवा-८००- इतर जमा रकमा (नऊ) अखिल भारतीय सेवेतील जे अधिकारी स्वीयेतर सेवेत प्रतिनियुक्तीवर आहेत त्यांच्याबाबत रजावेतन अंशदान (००७००११६)"

आ) **<u>निवृत्तीवेतन अंशदान</u> :-** "००७१- निवृत्तीवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभ यांच्या वसूली संबंधातील अंशदाने व वसुलीच्या रकमा- ०१ - नागरी १०१ -अभिदाने व अंशदाने (एक), स्वीयेतर सेवा अधिकारी (००७१ ००१२)"

**<u>टीप</u> :-** प्रतिनियुक्तीच्या कालावधीतील उपरोक्त रकमांचा भरणा करण्यात विलंब झाल्यास महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई ही संस्था दंडात्मक व्याज भरण्यास जबाबदार राहील.

(१२) **<u>नैमित्तिक रजा</u> :-** श्रीमती एम.एन.केरकेट्टा, भा.प्र.से. यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत राज्य शासनाच्या नियमानुसारच नैमित्तिक रजा उपभोगता येईल. प्रतिनियुक्तीच्या कालावधीत नैमित्तिक रजा मंजूर करण्यास, संस्थेच्या कार्यकारी प्रमुखास दुय्यम असलेल्या अधिकाऱ्यांना संस्थेचे कार्यकारी प्रमुख व संस्थेच्या कार्यकारी प्रमुखास रजा मंजूर करण्यास संबंधित मंत्रालयीन विभाग सक्षम असेल.

(१३) **<u>रजा प्रवास सवलत</u> :-** श्रीमती एम.एन.केरकेट्टा, भा.प्र.से. यांना अखिल भारतीय सेवा (रजा प्रवास सवलत) नियम, १९७५ मधील तरतुदीनुसार रजा प्रवास सवलत मिळण्याचा हक्क असेल. याबाबतचा खर्च महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई हया संस्थेस सोसावा लागेल.

त्यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत नैमित्तिक रजा वगळता इतर रजा कालावधीतील रजा प्रवास सवलत मंजूर करण्यास शासन (सा.प्र.वि. का. १०) सक्षम असेल.

त्यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत नैमित्तिक रजा मंजूर करण्यास सक्षम अधिकारी नैमित्तिक रजेच्या कालावधीत रजा प्रवास सवलत मंजूर करण्यास सक्षम असेल.

(१४) **वैद्यकीय सवलती :-** श्रीमती एम.एन.केरकेट्टा, भा.प्र.से. यांना अखिल भारतीय सेवा (वैद्यकीय देखभाल) नियम १९५४ मधील तरतुदीनुसार वैद्यकीय सुविधांचा लाभ अनुज्ञेय असेल. याबाबतचा खर्च महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई हया संस्थेस सोसावा लागेल. मात्र, सदर संस्थेचे त्यांच्या कर्मचाऱ्यांसाठी वैद्यकीय सवलती देण्याबाबत वेगळे नियम असतील आणि त्याचा लाभ श्रीमती एम.एन.केरकेट्टा, भा.प्र.से. हया घेऊ इच्छित असतील तर प्रतिनियुक्ती कालावधीत त्या नियमांचा लाभ घेण्याबाबत विकल्प देण्याचे स्वातंत्र्य त्यांना असेल.

(१५) **भविष्य निर्वाह निधी :-** श्रीमती एम.एन.केरकेट्टा, भा.प्र.से. यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत अखिल भारतीय सेवा (भविष्य निर्वाह निधी), नियम १९५५ मधील तरतुदीनुसार, भविष्य निर्वाह निधीची मासिक वर्गणी दरमहा त्यांच्या वेतनातून भरणे आवश्यक आहे. ही वर्गणी "८००९ - राज्य भविष्य निर्वाह निधी - १०४(००)(०१) - अखिल भारतीय सेवा भविष्य निर्वाह निधी (८०० ९५०३९)" या लेखा शिर्षाखाली जमा दर्शविण्यात यावी. सदर रकमेचा धनादेश त्यांचे भविष्य निर्वाह निधी खाते महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), एक / दोन, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर यांपैकी ज्या महालेखापालांकडे असेल त्या महालेखापालांच्या नांवे काढून भविष्य निर्वाह निधी अनुसूचीसह त्यांच्याकडे पाठविण्यात यावा.

प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्यांना त्यांच्या भविष्यनिर्वाह निधी खात्यातून परतावा प्राप्त / ना-परतावा अग्रिम मंजूर करण्यास शासन (सामान्य प्रशासन विभाग) सक्षम असल्यामुळे याबाबतचे अर्ज सामान्य प्रशासन विभाग / का. ९, मंत्रालय, मुंबई-३२ यांच्याकडे मंजूरीसाठी पाठविण्यात यावेत.

(१६) **विभागीय चौकशी :-** श्रीमती एम.एन.केरकेट्टा, भा.प्र.से. यांच्याविरुध्द विभागीय चौकशीबाबत, अखिल भारतीय सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९६९ हे नियम लागू असतील. प्रतिनियुक्तीवर असताना त्यांच्या विरुध्द विभागीय चौकशी करावयाची असेल तर त्यांना शासन सेवेत प्रत्यावर्तीत करण्यात येईल. यासंबंधी कारवाई अंतर्गत त्यांना शासनाने निलंबित केल्यास निलंबनाच्या कालावधीत त्यांना शासन निर्वाह भत्ता देईल. मात्र निर्वाह भत्त्याची

रक्कम महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई या संस्थेकडून वसूल करण्यात येईल.

(१७) **<u>बोनस किंवा सानुग्रह अनुदान</u> :-** श्रीमती एम.एन.केरकेट्टा, भा.प्र.से. यांना बोनस किंवा सानुग्रह अनुदान अनुज्ञेय नाही व हया संस्थेच्या नियमानुसार जरी त्यांना बोनस अथवा सानुग्रह अनुदान अनुज्ञेय असेल तरी ते त्यांना स्विकारता येणार नाही.

(१८) **<u>गट विमा योजना</u> :-** श्रीमती एम.एन.केरकेट्टा, भा.प्र.से. यांच्या वेतनातून दरमहा रुपये १२०/- इतकी रक्कम केंद्र शासकीय कर्मचारी गट विमा योजेनेच्या वर्गणीपोटी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई ही संस्था दरमहा वसूल करील आणि ही रक्कम धनादेशाद्वारे महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) एक, महाराष्ट्र, मुंबई यांच्याकडे पाठविल. ही रक्कम

(केंद्र शासकीय कर्मचारी गट विमा योजना सदस्यांबाबत)

" ८६५८ - सस्पेंन्स अकाउंटस - १२३ - ऑल इंडिया सर्व्हिसेस ऑफिसर्स ग्रुप इन्शुरन्स स्किम - रिकव्हरीज टूवर्डस, सेंट्रल गव्हर्नमेंट इम्प्लॉईज ग्रुप इन्शुरन्स स्किम मेड ॲप्लीकेबल टू आयएएस ऑफिसर्स बॉर्न ऑन दि महाराष्ट्र केडर सबस्क्रीप्शन आयएएस (८६५८-८६२-८)" या लेखाशिर्षाखाली जमा करण्यात यावी. याबाबतची माहिती / तपशिल दरमहा सहाय्यक संचालक (लेखा) सामान्य प्रशासन विभाग कार्यासन क्रमांक ९-अ मंत्रालय, मुंबई-३२ यांच्याकडे पाठविणे बंधनकारक आहे.

सदर वर्गणी भरण्यास विलंब करण्यात आल्यास विलंब कालावधीत दंडनिय दराने व्याज आकारण्यात येईल.

(१९) **<u>मोटार कार</u> :-** श्रीमती एम.एन.केरकेट्टा, भा.प्र.से. यांच्या प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्यांना वापरासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई ही संस्था वाहन उपलब्ध करुन देईल. सदर वाहनांचा खाजगी वापर पुढील अटीच्या अधिनतेने त्यांना करता येईल.

अ) वाहनाचा खाजगी वापर दरमहा २५० किलोमीटरहून अधिक होता कामा नये. यासाठी त्यांनी वेळोवेळी विहीत करण्यात येणाऱ्या दराने भाडे संस्थेस द्यावे लागेल.

आ) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक टीआरए -१०९०/ सीआर-३२०/९०/एसईआर-५, दिनांक १७.१०.१९९० अन्वये निर्गमित केलेल्या आदेशानुसार वाहनाच्या खाजगी वापरास परवानगी असेल. मात्र संबंधित आदेशात वेळोवेळी ज्या सुधारणा केल्या जातील त्या सुधारणाही वाहनाच्या खाजगी वापराबाबत आपोआप लागू असतील.

(२०) **<u>कर्ज आणि अग्रिम</u> :-** श्रीमती एम.एन.केरकेट्टा, भा.प्र.से. यांच्या प्रतिनियुक्तीच्या कालावधीत, भविष्य निर्वाह निधी परतावा प्राप्त / ना-परतावा अग्रिम, घरबांधणी अग्रिम, मोटार कार अग्रिम, वैयक्तिक संगणक अग्रिम मंजूर करण्यास शासन (सा.प्र.वि.) सक्षम असेल. याबाबतचे त्यांचे अर्ज सामान्य प्रशासन विभाग / का.९, मंत्रालय, मुंबई यांच्याकडे मंजूरीसाठी पाठविण्यात यावेत. महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई या संस्थेने त्यांना सदर अग्रिम मंजूर करु नये. महाराष्ट्र शासनाकडून यापूर्वीच घरबांधणी, मोटार कार, संगणक इ. अग्रिम मंजूर केले असेल आणि त्या संदर्भातील मूळ अग्रिम अथवा व्याजाची वसूली सुरु असेल तर दर महिन्याच्या वेतनातून ती वसुली करुन त्या रकमा वेगवेगळया धनाकर्षाद्वारे महाराष्ट्र कोषागार नियमातील नमुना क्र. ५५ मध्ये माहिती भरुन त्या नमुन्यासह पुढील महिन्यात सहायक संचालक (लेखा) सामान्य प्रशासन विभाग (९ -अ), मंत्रालय, मुंबई यांच्याकडे पाठविणे आवश्यक आहे. धनाकर्ष "सहायक संचालक (लेखा), सामान्य प्रशासन विभाग, ९-अ" या नावाने काढण्यात यावेत.

(२१) **<u>प्रतिनियुक्तीवर असताना रजेवरुन अथवा प्रशिक्षणावरुन परत आल्यानंतर नियुक्ती</u> :-** श्रीमती एम.एन.केरकेट्टा, भा.प्र.से. हया प्रतिनियुक्तीच्या कालावधीत रजेवर गेल्या किंवा प्रशिक्षणासाठी गेल्या आणि त्यांनी धारण करीत असलेल्या पदावर अन्य अधिकाऱ्याची नियुक्ती करण्यात आली आणि रजेवर अथवा प्रशिक्षणावरुन परत आल्यानंतर त्यांची नियुक्ती अन्य पदावर करण्यात आली तर रजावेतन, वेतन पदग्रहण अवधी, सक्तीचा खोळंबा कालावधी इत्यादीबाबत सर्व खर्च, रजा समाप्तीच्या अथवा प्रशिक्षण समाप्तीच्या दिनांकापासून ते अन्य पदाचा कार्यभार धारण करेपर्यंतच्या दिनांकापर्यंत महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई ही संस्था सोसेल.

(२२) **<u>निवासी शिपायाऐवजी रोखभत्ता</u> :-** महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई या संस्थेने प्रतिनियुक्तीच्या निवासस्थानी शिपाई दिला नसल्यास व श्रीमती एम.एन.केरकेट्टा, भा.प्र.से. हयांना प्रतिनियुक्तीवर जाण्यापूर्वी निवास शिपायाऐवजी रोखभत्ता अनुज्ञेय असल्यास किंवा महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई या संस्थेतील अधिकाऱ्यांना निवासी शिपायाऐवजी रोखभत्ता अनुज्ञेय असल्यास त्यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्याच दराने निवासी शिपायाऐवजी रोखभत्ता अनुज्ञेय असेल. मात्र, असा भत्ता घेण्यापूर्वी दरमहा अधिकाऱ्यांचे निवासी शिपाई देण्यात आलेला नाही असे प्रमाणपत्र संबंधित अधिकाऱ्याने देणे आवश्यक राहील.

(२३) **<u>शासनाने वेळोवेळी विहित केलेले नियम लागू करणे</u> :-** श्रीमती एम.एन.केरकेट्टा, भा.प्र.से. यांच्या प्रतिनियुक्तीच्या कालावधीत शासन वेळोवेळी जे नियम करील किंवा कार्यकारी आदेश निर्गमीत करील ते नियम / कार्यकारी आदेश लागू असतील.

(२४) **<u>प्रतिनियुक्ती कालावधीत देशात / परदेशात प्रवास</u>** :- महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई या संस्थेमध्ये प्रतिनियुक्तीवर असताना, सदर संस्थेच्या कामासंबंधी देशात कोठेही प्रवास करावयाचा झाल्यास शासनाच्या पूर्व परवानगीची आवश्यकता असणार नाही. मात्र संस्थेच्या कामाच्या संबंधात परदेशी जावयाचे असल्यास, शासनाची पूर्व परवानगी आवश्यक असेल. त्याचप्रमाणे संस्थेशी प्रत्यक्ष संबंध नसलेल्या शासकीय निमशासकीय कामानिमित्त अथवा खाजगी संस्थांच्या समारंभासाठी देशांतर्गत प्रवास करावयाचा असल्यास त्यासाठी शासनाची पूर्व परवानगी घेणे आवश्यक राहील.

(२५) **<u>विहित अटी शर्तीमध्ये समाविष्ट नसलेल्या अटी / शर्तीबाबत</u> :-** वर नमूद केलेल्या अटी/ शर्तीमध्ये समाविष्ट नसलेल्या विशिष्ट अटी / शर्तीबाबत महाराष्ट्र शासन संवर्गातील भारतीय प्रशासन सेवा अधिकाऱ्यांना जे नियम विनियम आणि कार्यकारी आदेश लागू असतील ते नियम, विनियम व कार्यकारी आदेश लागू असतील.

हा शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१३१७०३०६८६०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sunil Baburao Tumbare

Digitally signed by Sunil Baburao Tumbare
DN: CN = Sunil Baburao Tumbare, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Corporation marketing and Textile
Date: 2015.05.13 17:04:23 +05'30'

**( सु. बा. तुंबारे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. श्रीमती एम.एन.केरकेट्टा, भा.प्र.से., व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्यादित, कनमूर हाऊस, नरसीनाथा स्ट्रीट, मस्जिद, मुंबई
२. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
३. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे

४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्यादित, कनमूर हाऊस, नरसीनाथा स्ट्रीट, मस्जिद, मुंबई
५. महालेखापाल - १/२, (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
८. सामान्य प्रशासन विभाग मंत्रालय (कार्यासन क्र. ९ / ९ अ/ १०)
९. वित्त विभाग (सेवा-२), मंत्रालय, मुंबई - ३२
१०. निवडनस्ती.